राज्यकारभार आणि निवडून आलेल्या लोकांचा राज्यकारभारावर पूर्ण ताबा. (४) सरकारी सत्तेचे विभक्तीकरण. निरनिराळ्या सत्तांनी परस्परांवर नियंत्रण ठेवणे व समतोलपणा राखणें, (५) लोकशाही सत्ता परिणामकारक रीतीने चालण्याकरता लोकाना शिक्षण देणे. या सर्व गोष्टी जितक्या प्रमाणात करता येतील, तितक्या प्रमाणात तेथे लोकशाही आहे असे म्हणतां येईल. समान दर्जाच्या वसाहतीत लोकशाही स्थापन करता येते आणि म्हणूनच इतर अल्पसंख्याक वर्गांना अगर पक्षांना अशा राज्यपद्धतीबद्दल तक्रार करण्यास जागा नाही.

वसाहतीच्या स्वराज्यात आतरराष्ट्रीय, आतरवासाहतिक, आतरसाम्राज्यविषयक व अंतर्गत कारभारांत किती स्वातंत्र्य आहे, हे आपण पाहिलें.

ही सर्व चर्चा तात्त्विक स्वरूपाची आहे हे तर सांगावयास नकोच. कारण सरकारनें नुसते वसाहतीचा दर्जा हिंदुस्थानला मिळणार एवढे जाहीर केले आहे. दहा लाख रुपये एखाद्याच्या नांवावर बॅंकेत आहेत असेंच सांगण्यापैकी हा प्रकार आहे. हे पैसे भाऊबंद एकमताचे झाले तर त्यांना मिळणार आहेत असेहि सरकारने सांगितले नाही. तुम्ही प्रथम आपलें मतभेद मिटवा एवढेच ते म्हणत आहेत. पण हे मतभेद मिटले तर ताबडतोब स्वराज्य तुम्हाला मिळेल असें सरकार सांगत नाही. त्याचप्रमाणें हे मतभेद मिटविण्याकरता आवश्यक असणारी घटनापरिषदेची मागणीहि त्यांनी अद्याप मान्य केली नाही. त्यामुळें काय देणार व जें देणार तें केव्हा देणार याची काही कल्पना न देता नुसते मतभेद मिटवा असे सरकार सांगत आहे. हा त्याचा जुनाच डाव आहे. पण कॉंग्रेस या डावाला बळी पडत नाही. कॉंग्रेसनें घटना परिषदेच्या मागणीचा उलट पेच सुंदर टाकला आहे. ही मागणी मान्य झाली तरच सरकारची सदिच्छा व प्रामाणिकपणा सिद्ध होणार आहे. महायुद्धाची आंच जर सरकारला लागली व हिंदुस्थानच्या सहाय्यावांचून निभत नाही असें त्याना समजून आलें, तर ते कॉंग्रेसचें मागणें मान्य

करतील. कॉंग्रेसचे सहाय्य हे नैतिक स्वरूपाचे सहाय्यच आहे. पण ते सहाय्य त्यांना संपादन केले तरच ब्रिटिश सरकारचा सत्पक्ष आहे व ब्रिटिश सरकार लोकशाहीकरता लढत आहे असें आम्ही म्हणूं. अर्थात युद्धाच्या तीव्रतेवर आपल्या लोकशाहीचे प्रेम अवलंबून ठेवणे हे ब्रिटिश सरकारला भूषणावह नाही. पण लोकशाहीवरील प्रेमामुळे नसले आणि परिस्थितीने त्याना या प्रेमाचा पान्हा फोडला तरी आमची हरकत नाही. पण हे झाले नाही तर? तर कॉंग्रेसचा मार्ग उघड आहे. कॉंग्रेस ही परावलंबी संस्था राहीली नाही. म. गांधींनी या देशाला अहिंसेचा उज्ज्वल मार्ग दाखविला आहे आणि सत्याग्रहाचे परिणामकारक शस्त्र हातीं दिले आहे. त्या शस्त्राचा उपयोग करण्याची पाळी आली तरी चांगले आणि नाही आली तर काही वाईट होणार नाही. सध्याच्या युद्धाच्या वावटळीमुळे राजकीय स्वातंत्र्याचा प्रश्न निकरावर आला आहे; पण हे युद्ध झाले नसते तर आम्ही स्वस्थ बसलो असतो असें नाही. जोपर्यंत आम्ही आमच्या साधनाच्या यशस्वितेबद्दल निश्चित आहो, तोपर्यंत आम्हाला आमच्या पारतंत्र्याबद्दल भीति वाटत नाही. तें आज आलें नाही तर उद्यां खास येणार. आम्ही महाभारतात म्हटल्याप्रमाणें आहे. 'अलमेव शमायास्मि, तथा युद्धाय भारत!' या वृत्तीचे आहोत. ब्रिटिशाचे युद्धहेतू शुद्ध नाहीत आमचे हेतु शुद्ध आहेत, त्याचे साधन जगाचा उत्कर्ष करणारे नाही आमचे उत्कर्ष करणारे आहे, त्याची राज्यशासनपद्धती पिळवणूक करणारी आहे, आमची शासनपद्धती तशी होणार नाही. यामुळे शेवटी जय आमचाच होणार आहे यांत वाद नाही.

—समाप्त—

# सूची


| | |
|---|---|
| अॅपिले | ४५ |
| अॅटर्नी जनरल | १२७,१२९ |
| आफ्रिका दक्षिण | १५ |
| आफ्रिका हिंदी प्रश्न | ११७ |
| आयर्लंड | १८,२१,१५३ |
| ऑस्ट्रेलिया | १२ |
| कानडा | ८ |
| गव्हर्नर जनरल | ३३ |
| गांधी | १२०,१२४,१७८,१८०,१९१ |
| ग्वायर | १८४ |
| घटना परिषद .. | २३,१५६ |
| ,, ,, | १६१ |
| ,, फ्रान्स | १६२-१६५ |
| ,, रशिया | १६६ |
| ,, पोलंड | १६७ |
| ,, ऑस्ट्रिया | १६७ |
| ,, झेकोस्लोव्हेकिया | १६८ |
| ,, जर्मनी | १६८ |
| ,, वसाहती | १६९ |
| हिंदुस्थान | १७८,१८१,१८२ |
| चॅनल आयलंड्स | ६, |
| झेटलंड लॉर्ड | १३६ |
| डरहॅम लॉर्ड | १० |
| डोमिनिअन स्टेटस | २६ |
| तह परिषद | ३० |

| | |
|---|---|
| नॉर्थ अमेरिका ॲक्ट | ११ |
| न्यू झीलंड | १५ |
| न्यू फौंडलंड | १२ |
| नेहरू | १७२,१८० |
| परक्या देशांतील प्रजाजन हक्क | ४७ |
| परराष्ट्रांत वकील | ७४ |
| बॉल्डविन | १३० |
| बिलें ( मंजूरी, राखीव, संमती ) | ३६-३७ |
| बोनर लॉ | १२८ |
| मूर विरुद्ध ॲटर्नी जनरल | ८४ |
| राजनिष्ठेची शपथ | ८१ |
| लॉईड जॉर्ज | १४४ |
| लोकशाही | १९३ |
| वसाहत संरक्षण | ९१, १०३ |
| " भांडणे | १०९ |
| वेस्ट मिन्स्टर कायदा | ५४,६३ |
| व्यापारी नौकानयन | ४२ |
| " सवलती | १०१ |
| व्हाईसरॉय घोषणा | १२३ |
| साम्राज्य परिषद | ३० |
| सोव्हिएट युनियन | १९२ |
| हिंदुस्थान घोषणा | ११२ |
| हेली माल्कम | १२० |
| होअर | १२६,१३४ |
| होमरूल बील | २० |